**वार्षिक योजना सन २०१४-१५**
**पोलीसांच्या निवासी इमारतींच्या बांधकामासाठी निधी वितरित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृहविभाग

शासन निर्णय क्रमांकः सीआरपी - ०९१३/प्र.क्र.३३६( १ ) / पोल-७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: २६ नोव्हेंबर, २०१४.

**वाचा -**

१) क्रमांकः पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२७-अ / वार्षिक योजना / २०१४-१५/०१, दिनांक४.६.२०१४.

२) क्रमांकः वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१४/ प्र.क्र. ११०/ अर्थ-३, दिनांक १.७.२०१४.

**शासन निर्णय-**

पोलीस निवासी इमारतींच्या बांधकामासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात रुपये ७०.२३ कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १ जुलै, २०१४ च्या परिपत्रकातील सूचनेनुसार सदर तरतूदीच्या ६० % च्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार पोलीसांच्या निवासी इमारतींच्या बांधकामासाठी सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार रुपये ४२,१३,८०,०००/- (रुपये बेचाळीस कोटी तेरा लक्ष ऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. वितरीत करण्यात आलेली सदरहू रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून काढून ती पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. याबाबतचा खर्च " मागणी क्र.बी-१०, लेखाशिर्ष, ४०७०, इतर प्रशासकीय सेवांवरील भांडवली खर्च, (००) (०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (योजनांतर्गत) दत्तमत (४०७० ०१५१) ५० इतर खर्च, ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४११२७१७३२३४२६२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chitra Shahaji Patodekar

Digitally signed by Chitra Shahaji Patodekar
DN: CN = Chitra Shahaji Patodekar, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.11.29 16:47:07 +05'30'

**(चित्रा पाटोदेकर )**
अवर सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या, वरळी, मुंबई.
३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग, (व्यय-७,/ अर्थ-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
९. गृह विभाग, (बीयुडी-१/ बीयुडी-२) मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (पोल-७).

शासन निर्णय क्रमांक सीआरपी -०९१३/प्र.क्र.३३६ (१) /पोल-७ दिनांक २६ नोव्हेंबर, २०१४ च्या सोबतचे विवरण पत्र.

निवासी इमारती

( रुपये लाखात )

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | वितरीत निधी |
|---|---|---|
| १ | नंदुरबार, पोलीस अधी. यांचे करीता १६८ निवासस्थाने | १७६.२४ |
| २ | पोलीस आयुक्त, औरंगाबाद येथे ५६ निवासस्थाने बांधणे | ११८.०६ |
| ३ | औरंगाबाद भारतीय राखीव बटालियन ३०९ निवासस्थाने सातारा. | २५०.०० |
| ४ | सोलापूर १९७ निवासस्थाने रा.रा.पो.बल.गट.क्र.१० सोरेगांव | ४३५.०८ |
| ५ | विटा, जिल्हा सांगली येथे ५१ निवासस्थाने बांधणे. | ३०२.१८ |
| ६ | ठाणे २६० निवासस्थाने पोलीस आयुक्त, ठाणे शहर. | ८७५.२३ |
| ७ | नवी मुंबई १७१ निवासस्थाने रा.रा.पो.बल.गट क्र.११ बाळेगांव | १०१६.४४ |
| ८ | रायगड ३६ निवासस्थाने, अलिबाग | ४०.१० |
| ९ | यवतमाळ येथे ५२ निवासस्थाने पांढरकवडा | ५६६.८५ |
| १० | उस्मानाबाद जिल्ह्यातील तिर्थक्षेत्र तुळजापूर येथे नवरात्र उत्सव व इतर कालावधीत राज्यातून बंदोबस्ताकामी आलेल्या पोलीस कर्मचारी यांचेसाठी ४०० निवासस्थानांचे बांधकाम करणे. | ३४८.८७ |
| ११ | आटपाटी जि. सांगली येथे ४७ निवासस्थाने बांधणे. | ८४.७५ |
| | **एकुण (अ)** | ४२१३.८० |

**(रुपये बेचाळीस कोटी तेरा लाख ऐंशी हजार फक्त)**

(चित्रा पाटोदेकर)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**